जिल्हा परिषद व पंचायत समितीने स्थानिक निधी लेखापरिक्षा विभागाच्या लेखापरीक्षण अहवालातील परिच्छेदांच्या अनुपालनावर L-CAP पोर्टलद्वारे ऑनलाईन पध्दतीने कार्यवाही करणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१९/प्र.क्र.७२/कोषा-प्रशा-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ जानेवारी, २०२०.

**वाचा :- वित्त विभाग, शासन निर्णय क्र.स्थानिले-१०१०/प्र.क्र.२६-ब/विमा प्रशा, दि.३१.०३.२०११**

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र स्थानिक निधी लेखापरिक्षा, अधिनियम १९३० नुसार स्थानिक निधी लेखापरिक्षा विभागामार्फत ग्रामीण तसेच नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचे वार्षिक लेखापरीक्षण करून तयार करण्यात आलेल्या लेखापरीक्षण अहवाल संबंधित संस्थेस निर्गमित केले जातात. तसेच महाराष्ट्र स्थानिक निधी लेखापरिक्षा, अधिनियम, १९३० मधील कलम ८ नुसार निर्गमित करण्यात आलेल्या लेखापरिक्षण अहवालातील परिच्छेदांच्या अनुषंगाने, स्थानिक स्वराज्य संस्थेमार्फत सदर अधिनियमातील कलम १० अन्वये स्थानिक निधी लेखापरिक्षा कार्यालयास अनुपालने सादर केली जातात.

स्थानिक निधी लेखापरिक्षा विभागामार्फत स्थानिक स्वराज्य संस्थेचे लेखापरिक्षण पूर्ण झाल्यानंतर, संबंधित संस्थेस लेखापरीक्षण अहवाल टंकलेखन करून निर्गमित केला जात असे. मात्र लेखापरीक्षण वर्ष सन २०१२-२०१३ पासून स्थानिक स्वराज्य संस्थांचे वार्षिक लेखापरीक्षण अहवाल हे संचालनालय स्थानिक निधी लेखापरीक्षा, महाराष्ट्र राज्य यांनी राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, NIC पुणे यांचेमार्फत विकसित करण्यात आलेल्या Maharashtra Audit Information Network System (MAINS) या प्रणालीद्वारे ऑनलाईन पध्दतीने निर्गमित केले जातात.

यापूर्वी लेखापरिक्षण अहवालातील परिच्छेदांची अनुपालने ही स्थानिक निधी लेखापरीक्षा कार्यालयाकडे टपालाने सादर करण्यात येत होती. परंतु लेखापरिक्षण अहवालातील परिच्छेदांची अनुपालनेदेखील लेखापरिक्षण अहवालाप्रमाणे online पद्धतीने सादर करणेबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय :-

स्थानिक निधी लेखापरिक्षा विभागामार्फत लेखापरिक्षण वर्ष सन २०१३-२०१४ पासून पुढील सर्व लेखापरिक्षण अहवालातील परिच्छेदांची स्थानिक स्वराज्य संस्थांमार्फत केली जाणारी अनुपालने ही माहे जानेवारी, २०२० पासून ऑनलाईन पध्दतीने स्वीकारली जातील. त्यासाठी संचालनालय स्थानिक निधी लेखापरिक्षा, महाराष्ट्र राज्य यांनी राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, NIC पुणे यांचे मार्फत Local Fund

Compliance Of Audit (L-CAP) ही ऑनलाईन पोर्टल MAINS प्रणालीवर कार्यान्वित करण्यात आले आहे. तसेच यापुढील परिच्छेदांच्या अनुपालनाची कार्यवाही राज्यातील सर्व जिल्हा परिषद व पंचायत समिती यांनी सदर पोर्टलद्वारेच ऑनलाईन पध्दतीने करावयाची आहे.

२. माहे जानेवारी, २०२० पासून राज्यातील सर्व जिल्हा परिषद/पंचायत समिती यांना सदर प्रणालीद्वारे ऑनलाईन पध्दतीने अनुपालने सादर करणे बंधनकारक राहणार आहे. सदर प्रणालीचे संकेतस्थळाविषयी, त्याच्या वापराविषयी संबंधित जिल्हयातील स्थानिक निधी लेखापरिक्षा कार्यालयामार्फत सर्व जिल्हा परिषद/पंचायत समितीच्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना आवश्यक ते प्रशिक्षण व तांत्रिक मार्गदर्शन देण्यात येईल.

३. तरी या शासन निर्णयाद्वारे राज्यातील सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सूचित करण्यात येते की, माहे जानेवारी २०२० पासून जिल्हा परिषद/पंचायत समिती यांची अनुपालने L-CAP पोर्टलद्वारे ऑनलाईन पध्दतीने स्थानिक निधी लेखापरिक्षा विभागास सादर करणे बंधनकारक राहील. तसेच दिनांक ०१ एप्रिल, २०२० पासून राज्यातील सर्व महानगरपालिका, नगरपालिका व नगरपंचायत यांची लेखापरिक्षण अहवाल वर्ष सन २०१३-२०१४ पासूनच्या परिच्छेदांची अनुपालनेदेखील स्थानिक निधी लेखापरीक्षा कार्यालयास L-CAP पोर्टलद्वारे ONLINE पद्धतीने सादर करणे बंधनकारक राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा सांकेतांक २०२००११४१५४१०५७४०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI, serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.01.14 15:20:49 +05'30'

**(इंद्रजित गोरे)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा /विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय,मुंबई.
२) सर्व सन्माननिय विधानसभा  विधानपरिषद व संसद सदस्य,
३) राज्यपालाचे सचिव.
४) मुख्यमंत्र्यांचे व उपमुख्यमंत्र्यांचे सचिव.
५) सर्व मंत्री व राज्यमंत्री याचे खाजगी सचिव
६) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
७) मंत्रालयीन सर्व विभागाच्या अधीन असलेल्या सर्व विभागाचे व कार्यालयाचे प्रमुख
८) प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
९) प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१ व (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२ व (लेखा व अनुज्ञेयता)-२ महाराष्ट्र,नागपूर.

११) आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई. ४०००० २.
१२) आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन,नागपूर ४४४००१
१३) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई.
१४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१५) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१६) प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोकायुक्त याचे कार्यालय, मुंबई.
१७) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई.
१८) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१९) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२०) सर्व विभागीय आयुक्त.
२१) आयुक्त, नगरपालिका प्रशासन, वरळी, मुंबई/सर्व आयुक्त, महानगरपालिका
२२) सर्व जिल्हाधिकारी/सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
२४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई व जिल्हा कोषागारे
२५) सहसंचालक, लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती.
२६) संचालक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
२७) सहसंचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती.
२८) निवड नस्ती/कोषा-प्रशा-४.